**कृषि विद्यापीठे, कृषि विद्यापीठाशी संलग्न असलेली महाविद्यालये संलग्नशास्त्र यांचेकडील शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचा-यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत योजनेच्या सभासदांचा सेवा कालावधीत मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना द्यावयाच्या सानुग्रह अनुदान व लाभाबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि व पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मकृप १०१८/प्र.क्र.२३०/६-अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२०.

<u>**संदर्भ**</u> :- वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक: अंनियो २०१७/प्र.क्र २९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर, २०१८

<u>**प्रस्तावना :**</u>

दि.१.११.२००५ रोजी व त्यानंतर कृषि विद्यापीठाच्या सेवेत रुजू झालेल्या कर्मचा-यांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ अन्वये नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : अंनियो १००७/१८/सेवा-४, दि.७.७.२००७ अन्वये ठरविण्यात आली आहे.

तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: अंनियो २०१२/प्र.क्र.९६/सेवा-४, दि.२७.८.२०१४ अन्वये सदरची योजना केंद्राच्या धर्तीवर राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत समाविष्ट केलेली आहे.दि.१/११/२००५ रोजी व त्यानंतर शासकीय सेवेत रुजू झालेल्या परिभाषित अशंदान निवृत्तीवेतन योजना /राष्ट्रीय निवृत्ती योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम,१९८२ च्या तरतुदी लागू होत नाहीत. त्यामुळे त्यांना निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतन, मृत्यु-नि-सेवा उपदान व भविष्य निर्वाह निधीचे लाभ अनुज्ञेय ठरत नाहीत. दि.३१.३.२०१५ पर्यंत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना कार्यान्वित असल्याने कर्मचा-यास त्याचे स्वत:चे अंशदान अधिक कृषि विद्यापीठांचे समतुल्य अंशदान व त्यावरील व्याज भविष्य निर्वाह निधीच्या दराने देय केले आहेत व या योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आल्यास या कर्मचा-यांना त्यांच्या खात्यावर जमा असलेल्या रकमांचे परतावे देण्यात येतात. या योजनेमध्ये कर्मचा-यांची रक्कम वार्षिक योजनेमध्ये (Annuity Plan) गुंतविण्याची तरतूद नसल्याने त्यांच्या खात्यावर जमा असलेल्या रक्कमेशिवाय त्यास इतर कोणतेही लाभ देय होत नाहीत.

दिनांक ०१.०४.२०१५ पासून राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना कार्यान्वित झाली आहे. राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत कर्मचा-यांना वेतनातून कपात झालेल्या अंशदानावर कृषि विद्यापीठाचे सममूल्य अंशदान देण्यात येते. सदरची अंशदाने निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरणाने नेमलेल्या निधी व्यवस्थापकामार्फत गुंवतणूकीसाठी उपलब्ध करुन देण्यात येतात. या रक्कमा कर्मचा-यांचे योजनेचे सदस्यत्व, मृत्यु, सेवानिवृत्ती, राजीनामा इत्यादी कारणामुळे संपुष्टात आल्यावर निचृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरणाने ठरविलेल्या नियमानुसार वार्षिक योजना (Annuity Plan) मध्ये गुंतविण्यात येऊन त्यावर कर्मचा-यास/त्याच्या वारसास मासिक निवृत्तीवेतन विषयक लाभ देण्याची तरतुद आहे. परंतु मृत्यु झाल्यास सद्य:स्थितीत कोणतीही वार्षिक योजना (Annuity Plan) कार्यान्वित नसल्याने कर्मचा-यास त्याच्या खात्यावर जमा झालेला सर्व संचित निधी दिला जातो.

सदर योजनेच्या सभासदाचा सेवेत असतांना अल्प सेवा होऊन मृत्यु झाल्यास, सदर कर्मचा-याच्या कुटुंबियांस त्याच्या खाती जमा असणा-या संचित निधी व्यतिरिक्त इतर कोणतेही लाभ मिळत नाहीत. त्यामुळे अशा कर्मचा-यांच्या कुटुंबियांना आर्थिकदृष्टया मदत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. याबाबत सर्वंकष विचार करुन शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

"दिनांक ०१.११.२००५ रोजी व त्यानंतर कृषि विद्यापीठे, कृषि विद्यापीठाशी संलग्न असलेली महाविद्यालय संलग्न शास्त्र यांचेकडील शिक्षक, शिक्षकेत्तर सेवेत नियुक्त झालेल्या व परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचा सदस्य असणारा कर्मचारी १० वर्षे सेवा होण्यापूर्वी सेवेत असतांना मृत्यु पावल्यास, त्याच्या नामनिर्देशित व्यक्तीस, नामनिर्देशन केले नसल्यास त्याच्या कायदेशीर वारसास सानुग्रह अनुदान रु.१० लक्ष अधिक कर्मचा-याच्या खाती जमा असलेली संचित रक्कम देण्यात यावी."

२. दिनांक ०१.११.२००५ रोजी व त्यानंतर कृषि विद्यापीठे, कृषि विद्यापीठाशी संलग्न असलेली महाविद्यालय संलग्न शास्त्र यांचेकडील शिक्षक, शिक्षकेत्तर सेवेत नियुक्त झालेला कर्मचारी जर परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचा सदस्य होण्यास पात्र असेल, परंतु त्याचे खाते उघडण्याची जबाबदारी ज्या कार्यालयाची आहे, त्या कार्यालयांनी ती पार पाडली नसेल किंवा सदर कर्मचा-याचा दोष नसतांना काही अपरिहार्य कारणास्तव त्याचे खाते उघडले गेले नसेल अशा कर्मचा-याच्या नामनिर्देशित व्यक्तीस, नामनिर्देशन केले नसल्यास त्याच्या कायदेशीर वारसास देखिल रु.१० लक्ष इतके सानुग्रह अनुदान अनुज्ञेय राहील. मात्र अशा प्रकरणांना मान्यता देण्यापूर्वी वित्त विभागाची सहमती घेणे आवश्यक असेल

३. या शासन निर्णयाद्वारे अनुज्ञेय होणा-या सानुग्रह अनुदानाचा लाभ --

अ) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या कर्मचा-यांच्या कृषि विद्यापीठाच्या सेवेत असतांना १० वर्षे सेवा पूर्ण होण्यापूर्वी मृत्यु झाल्यास, त्या कर्मचा-याने नामनिर्देशित केलेली व्यक्तीस अथवा

ब) जर त्या कर्मचा-याने नामनिर्देशन केले नसेल तर त्याच्या कायदेशीर वारसास अनुज्ञेय राहील.

४. या शासन निर्णयान्वये अनुज्ञेय ठरणारे सानुग्रह अनुदान मंजूरीचे अधिकारी प्रशासकीय विभाग प्रमुख यांना राहतील. त्यांना हे अधिकार त्यांच्या दुय्यम अधिका-यास प्रत्यार्पित करता येणार नाहीत.

५. सदर योजनेची कार्यपध्दती सोबत जोडलेल्या "जोडपत्र" व परिशिष्ट क्रमांक १ ते ३ प्रमाणे अंमलात आणावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५७/२२८दि. १३/११/२०१९ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२८११३३५६४३०१ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.02.28 11:46:00 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महासंचालक/सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२.संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे,

३.कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी, जिल्हा-अहमदनगर,

४.कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,

५.कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,

६.कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,

७.उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर/दापोली/अकोला/परभणी,

८.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
९.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर,
११.उपकोषागार अधिकारी, राहुरी, जि.अहमदनगर,
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी,
१३.उपकोषागार अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी,
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला,
१५.उपकोषागार अधिकारी, अकोला, जि.अकोला,
१६.जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी,
१७.उपकोषागार अधिकारी, परभणी, जि.परभणी,
१८.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
२०.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
२१.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२२.उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२३.वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-२/अर्थसंकल्प-१३/सेवा-४/संचालनालय लेखा व कोषागारे), मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२,
२४.कक्ष अधिकारी, कार्यासन २अे/७अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२,
२५.कार्यासन ६-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२.

कृषि व पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्रमांक: मकृप १०१८/प्र.क्र.२३०/६-अे, दि. डिसेंबर,२०१९ मध्ये निर्दिष्ट केलेले जोडपत्र

## जोडपत्र

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचा सदस्य असणारा कृषि विद्यापीठातील कर्मचारी १० वर्ष सेवा होण्यापूर्वी सेवेत असतांना मृत्यू पावल्यास त्याच्या नामनिर्देशित व्यक्तीस/कायदेशीर वारसास सानुग्रह अनुदान रुपये १० लक्ष मंजूर करण्या संदर्भात करावयाची कार्यवाही.

१) कर्मचा-याच्या नामनिर्देशित व्यक्तीने/कायदेशीर वारसाने करावयाची कार्यवाही:-

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या कृषि विद्यापीठातील कर्मचा-यांचा १० वर्ष सेवा होण्यापूर्वी सेवेत असतांना मृत्यू झाल्यास त्या कर्मचा-याने नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीने किंवा जर त्या कर्मचा-याने नामनिर्देशन केले नसेल तर, कायदेशीर वारसाने कर्मचा-याच्या मूळ मृत्यू प्रमाणपत्रासह सानुग्रह अनुदान रुपये १० लक्ष मिळण्यासाठी नियंत्रण अधिका-यांकडे या सोबतच्या विहित नमुन्यात (परिशिष्ट-१) मध्ये अर्ज सादर करावा.

२) नियंत्रण अधिकारी यांनी करावयाची कार्यवाही:-

नियंत्रण अधिका-याने मृत कर्मचा-याच्या नामनिर्देशित व्यक्ती/कायदेशीर वारसाचा मूळ अर्ज परिशिष्ट-१, मूळ मृत्यू प्रमाणपत्र, सेवा पुस्तकाचे प्रथम पान तसेच प्रथम नियुक्तीची नोंद असलेल्या पानाची साक्षांकित प्रत, सेवार्थ आयडी, डीसीपीएस सभासद असल्याचे प्रमाणपत्र, डीसीपीएस क्रमांक/पॅन क्रमांक/विद्यापीठ सेवेतील नियुक्तीचे सक्षम प्राधिका-याचे आदेश यासह या सोबतच्या परीशिष्ट-२ मध्ये कार्यालय प्रमुखामार्फत नियंत्रक, कृषि विद्यापीठ यांचेकडे शिफारशीसह प्रस्ताव सादर करेल.

३) कुलसचिव यांनी करावयाची कार्यवाही :-

नियंत्रक, कृषि विद्यापीठ यांचेकडून परिशिष्ट -२ मध्ये प्रस्ताव प्राप्त झाल्यावर त्या सोबतचे दस्ताऐवज /प्रमाणपत्रे इ. चे आधारे खात्री करुन सोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये प्रशासकीय विभाग प्रमुख सानुग्रह अनुदान मंजूरी आदेश निर्गमित करेल. आदेशाची एक प्रत संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, दुसरी प्रत कार्यालय प्रमुख/आहरण व संवितरण अधिकारी/विभाग प्रमुख आणि तिसरी प्रत (स्वाक्षरीत) कर्मचा-याच्या वारसास पाठविण्यात यावी. चौथी प्रत (कार्यालयीन प्रत) प्रशासकीय विभाग प्रमुख यांनी त्यांचे कार्यालयीन अभिलेख्यात जतन करावी.

४) नियंत्रण अधिकारी/आहरण व संवितरण अधिकारी परिशिष्ट-३ मधील मंजुरी आदेशाच्या आधारे कोषागारास देयक सादर करतील. सदर देयक नमुना महाराष्ट्र कोषागार नियम ४५-ए मध्ये सादर करण्यांत यावे.

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत प्रदान करण्यात येणारी सानुग्रह अनुदानाची रक्कम कृषि विद्यापीठाच्या संबंधित लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी..

परिशिष्ट-१

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कृषि विद्यापीठ कर्मचा-यांच्या नामनिर्देशित व्यक्तीने/वारसाने सानुग्रह अनुदान मागणीबाबत करावयाचा अर्ज.

कर्मचा-याच्या नामनिर्देशित व्यक्ती/वारसाचे नाव व पूर्ण पत्ता

----------------------------------------------------

________________________________

दिनांक : -

प्रति,

नियंत्रक,

कार्यालयाचे नाव व पत्ता

विषय:- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान मिळणेबाबत.

महोदय,

कै.श्री./श्रीमती ------------------------ हे/ कृषि विद्यापीठाच्या सेवेत दि. ते दि. कार्यरत होते/होत्या. सेवेत असतांना दि. रोजी त्यांचे निधन झाले आहे. सेवेत असतांना ते/त्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना /राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना या योजनेचे सभासद होते/होत्या.

१. त्यांनी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत रक्कम मिळण्यासाठी मला नामनिर्देशित केले आहे/नाही. (नसल्यास ---------------------------- मी त्यांचा कायदेशीर वारस ठरत आहे.) त्यामुळे उपरोक्त या योजनेंतर्गत देय केलेले सानुग्रह अनुदान मिळावे, ही विनंती. यासोबत मी कै.श्री./श्रीमती--------------------------- यांच्य मृत्यूच्या दाखल्याची मूळ प्रत सोबत जोडत आहे. त्यांचेशी माझे नाते पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | नाव | मयत कर्मचा-याशी नाते |
|---|---|---|
| | | |

२.  कर्मचा-याचा आवश्यक तपशिल खालीलप्रमाणे आहे----

| कर्मचा-याचे नाव | सेवार्थ आयडी/DCPS क्रमांक/ PRAN क्रमांक | सेवेत रुजू झाल्याची तारीख |
|---|---|---|
| | | |

सोबत :- १) मृत्यूचा दाखला (मूळ प्रत)
२) वारस प्रमाणपत्र

स्थळ :-

आपला/आपली विश्वासू,

दिनांक :-

(                    )

## परिशिष्ट-२

कार्यालय प्रमुख/आहरण व संवितरण अधिका-यांचे परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कृषि विद्यापीठ कर्मचा-याच्या नामनिर्देशित व्यक्तीस/वारसास सानुग्रह अनुदान मंजूरीबाबत प्रशासकीय विभाग प्रमुखास करावयाचा अर्ज.

कर्मचा-याच्या नामनिर्देशित व्यक्ती/वारसाचे नाव व पूर्ण पत्ता
---------------------------------------------------
————————————————————————
दिनांक : -

प्रति,

प्रशासकीय विभाग प्रमुख,
----------------------
----------------------

विषय:- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सभासदाच्या नामनिर्देशित व्यक्तीस / कायदेशीर वारसास सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत..

महोदय,

या कार्यालयात कार्यरत असलेले कर्मचारी श्री./श्रीमती ------------------------ यांचे दि. रोजी निधन झाले. सदर कर्मचारी कृषि विद्यापीठाच्या सेवेत असतांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना या योजनेचे सभासद होते. उपरोक्त कारणामुळे कर्मचा-याची सेवा संपुष्टात आल्यामुळे शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-७, दि.२९ सप्टेंबर, २०१८ अनुसार सानुग्रह अनुदान मिळणेबाबत त्यांनी नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीचा/नामनिर्देशन नसल्याने कायदेशीर वारसदाराचा अर्ज प्राप्त झालेला आहे. त्या अनुषंगाने सदर कर्मचा-याचा तपशिल पुढीलप्रमाणे सादर करण्यात येत आहे.

| नांव, पदनाम | सेवार्थ आयडी/DCPS क्रमांक/ PRANक्रमांक | सेवेत रुजू झाल्याचा दिनांक | मृत्यू दिनांक | मृत्यूच्या दिनांकास झालेली सेवा/वर्षे/ महिना /दिवस | कोषागाराचे नाव |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

यासोबत खालील नमूद केल्याप्रमाणे आवश्यक दस्ताऐवज सादर करण्यात येत आहे.

१.नामनिर्देशित व्यक्ती/कायदेशीर वारसदाराचा अर्ज-परिशिष्ट-१ (मूळप्रत)

२.मृत्यूचा दाखला (मूळ प्रत)

३.वारस प्रमाणपत्र (मूळ प्रत)

४.कर्मचा-याच्या कृषि विद्यापीठ सेवेतील नियुक्ती आदेशाची साक्षांकित प्रत.

५.कर्मचा-याच्या सेवापुस्तकाचे प्रथम पान तसेच प्रथम नियुक्तीची नोंद असलेल्या पानाची साक्षांकित प्रत.

६.डीसीपीएस/एनपीएस सभासद असल्याचे प्रमाणपत्र.

७. कर्मचाऱ्याकडून शासकीय येणे बाकी नसल्याचे प्रमाणपत्र.

तरी,सदर नामनिर्देशित व्यक्ती/नामनिर्देशन नसल्याने कायदेशीर वारस श्री./श्रीमती--------------------- यांना रु.१० लक्ष सानुग्रह अनुदान मिळण्यास शिफारस आहे.

आपला/आपली विश्वासू

स्वाक्षरी

कार्यालय प्रमुख/आहरण व संवितरण अधिकारी

याच नमुन्यात कार्यालय प्रमुखाने कृषि विद्यापीठास अर्ज करावा.(आवश्यक त्या फेरफारासह)

परिशिष्ट-३

क्रमांक:
कार्यालय प्रमुख-----------------------------
---------------------------
कार्यालयाचे नाव व पत्ता: --------------------
----------------------------------------
-------------------------------
दिनांक: ------------------------------

वाचा:-

१) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र. अनियो २०१७/प्र.क्र २९/सेवा-४,दि. २९ सप्टेंबर,२०१८

२) --------------- कुलसचिव (संबंधित कृषि विद्यापीठ) यांचेकडून प्राप्त झालेल्या दि. रोजीचा सानग्रह अनुदान मंजुरीचा प्रस्ताव

३) कर्मचाऱ्यांचे नावं----------------- यांचे नामनिर्देशित व्यक्ती/कायदेशीर वारसदार श्री./श्रीमती----------------- यांचा परिभाषित अशंदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेतंर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरीता प्राप्त झालेला दि. रोजीचा अर्ज

आदेश

उपरोक्त क्र.२ अन्वये कुलसचिव (संबंधित कृषि विद्यापीठ) यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्री./श्रीमती -------------------------- यांच्यावर क्र.३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग,शासन निर्णय क्र.अंनियो २०१७/प्र.क्र २९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर २०१८, अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, श्री./श्रीमती---------------यांच्या नामनिर्देशित व्यक्तीस/नामनिर्देशन नसल्याने कायदेशीर वारसास श्री./श्रीमती--------------यांना सानुग्रह अनुदान रु.१०,००,०००/- (अक्षरी दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत.

सदर "सानुग्रह अनुदान" कृषि विद्यापीठ कर्मचारी सेवेत असतांना १० वर्षे कृषि विद्यापीठातील सेवा होण्यापूर्वी दि.------------रोजी मृत्यु पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्षे कालावधीसाठी ग्राहय राहतील.

सदर खर्च सर्व कृषि विद्यापीठांनी संबंधित लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

प्रशासकीय विभाग प्रमुख

-----------------

प्रत:- १) अधिदान व लेखा अधिकारी/कोषागार अधिकारी यांना माहिती तथा उचित कार्यावाहीस्तव

२) ------------------कार्यालय प्रमुख/आहरण व संवितरण अधिकारी यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव.

३) श्री. /श्रीमती------------------ यांना माहितीस्तव.